**समाजामध्ये जागरुकता, धार्मिक सलोखा निर्माण करुन गुन्हेगारीचे प्रमाण कमी करण्यासाठी पोलीसांमार्फत राबविण्यात येणाऱ्या “Community Policing” या योजनेतंर्गत निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.......**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एनएएक्स ०५२४/प्र.क्र.१९७/विशा-१ब**
मंत्रालय (मुख्य इमारत), दुसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २३ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ :-** पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/३३/७१२५/कम्युनिटी पोलिसींग/४६/२०१६, दि.०६.०८.२०२४.

**प्रस्तावना:-**

राज्यात सर्व धर्म, जाती /जमातीचे लोक राहत असून त्यांच्यामध्ये बंधुभाव, मैत्रीचे संबंध राहणे आवश्यक आहे. धार्मिक सण, उत्सव व मिरवणुका इत्यादीच्या वेळी ताणतणाव, मतभेद निर्माण होणार नाहीत यासाठी आवश्यक ती काळजी घ्यावी लागते. आवश्यक ती काळजी घेऊनही दुर्दैवाने काही अनुचित प्रकार घडल्यास सर्व जाती/धर्माच्या प्रमुख व्यक्तींच्या सहकार्याने प्रकरणे चिघळणार नाहीत यासाठी सातत्याने प्रयत्न करावे लागतात. त्याचप्रमाणे जनतेचा पोलीसांच्या कामामध्ये सहभाग घेऊन गुन्हेगारीचे प्रमाण कमी करणे, जनतेच्या मनात पोलीसांबद्दल गाढ विश्वास निर्माण करुन जनता व पोलीस यांच्यामध्ये सुसंवाद निर्माण करणे, यासाठी मोहल्ला एकता समिती, शांतता समिती, मोहल्ला पंचायत, तंटामुक्त समिती, पोलीस मित्र आणि इतर छोटे स्थानिक पातळीवरचे उपक्रम राबवून स्थानिक पोलीसांनी यापूर्वीच शांतता राखणे अशा उपक्रमांवरील खर्चास "Community Policing" या योजनेअंतर्गत निधी उपलब्ध करुन देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

समाजामध्ये जागरुकता, धार्मिक सलोखा निर्माण करुन गुन्हेगारीचे प्रमाण कमी करण्यासाठी पोलीसांमार्फत राबविण्यात येणाऱ्या "Community Policing" या योजनेकरीता सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात विधानमंडळाच्या जुन -२०२४ च्या पावसाळी अधिवेशनात बाब क्रमांक-१० अन्वये वित्त विभागाने पुरवणी मागणीद्वारे रु. २,५०,००,०००/- (रु. अडीच कोटी फक्त) इतका निधी मंजूर केला असुन सदर निधी पैकी ५० लक्ष इतका निधी वितरीत करण्यास व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी आणि त्यांच्या अंतर्गत आहरण व संवितरण अधिकाऱ्यास आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. सदरचा खर्च " मागणी क्र.बी-१,२०५५, पोलीस (००) १०९ जिल्हा पोलीस (००) (१५) संगणक सांकेतांक क्रमांक २०५५०A११२ याखालील “५०-इतर खर्च” "Community Policing" या लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या सन २०२४-२५ च्या पूरक अनुदानातून भागविण्यात यावा.

४. पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध करुन देण्यात येत असलेला संपूर्ण निधी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४५०/२०२४/व्यय-७, दि.०९.०८.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८२३१४५३४५०२२९ असा असून डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DILIP RAMCHANDRA BAGANE

Digitally signed by DILIP RAMCHANDRA BAGANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=d9bdeba4f5b208a7811899a0f4522d8086dc2e6e2655bea26b70db55378254d2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A4FF332F80CE4E5A25F28D86597D7AC1C7CA6C95D9241BE4EB51488570F63A29, cn=DILIP RAMCHANDRA BAGANE
Date: 2024.08.23 15:09:11 +05'30'

**( दिलीप बागणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक, मुंबई
२. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग यांचे स्वीय सहायक..
३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. पोलीस आयुक्त, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा व परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा व परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / बांद्रा.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९. कक्ष अधिकारी (अर्थ-१), गृह विभाग,मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग, व्यय-४ / व्यय-७, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती (कार्यासन विशा-१ब).